कारागृहात क्लोज्ड सर्किट
टी.व्ही. यंत्रणा बसविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : एमआयएस २००५/प्र.क्र.८६/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : २४ ऑगस्ट, २००५.

**शासन निर्णय** :- राज्यातील येरवडा (पुणे), मुंबई, ठाणे, नागपूर, नाशिक, अमरावती, औरंगाबाद व कोल्हापूर या ठिकाणी मध्यवर्ती कारागृहे आहेत. या ठिकाणी सुरक्षेच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचे असे अनेक बंदी बंदीस्त आहेत. या बंद्यांच्या हालचालीवर कडक नियंत्रण ठेवण्यासाठी तसेच कारागृह अधिक्षकांना तुरुंगाच्या इतर, अधिकारी व कर्मचा-यांवर नियंत्रण ठेवण्यासाठी राज्यातील सर्व मध्यवर्ती कारागृहामध्ये क्लोज्ड सर्किट टी.व्ही.यंत्रणा बसविण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. त्यासाठी विनिर्दिष्टतेनुसार कोणती सुयोग्य यंत्रणा बसविणे सोईस्कर होईल हे ठरविणे यासाठी खालील सदस्यांची एक समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | प्रधान सचिव (तुरुंग). | अध्यक्ष |
| २) | सचिव (व्यय), वित्त विभाग | सदस्य |
| ३) | सचिव (माहिती व तंत्रज्ञान) | सदस्य |
| ४) | संचालक, उद्योग संचालनालय | सदस्य |
| ५) | कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा**:-क्लोज्ड सर्कीट टी.व्ही.यंत्रणेसाठी लागणारी सुयोग्य उपकरणे विनिर्दिष्ट करणे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( आ. ग. परदेशी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

१) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सर्व कारागृह उपमहानिरीक्षक.
३) प्रधान सचिव (तुरुंग) यांचे स्वीय सहाय्यक.
४) सचिव (व्यय), वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
५) सचिव (माहिती व तंत्रज्ञान),यांचे स्वीय सहाय्यक.
६) संचालक, उद्योग संचालनालय यांचे स्वीय सहाय्यक,
७) निवड नस्ती, पीआरएस-२.

****